अभ्यागत संपादकांच्या भेटीची सवलत पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विनिमं-२०१५/प्र.क्र.२२/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक :- ९ जुलै, २०१५

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. व्हिकेयु-१९६३(एफ) बीएलसी, दि. ०६.०६.१९६३.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. व्हिकेयु-१९६६(एफ) बीएलसी, दि. ३१.०३.१९६६.
३)मराठी भाषा विभाग शासन निर्णय क्र.विनिमं-२०११/प्र.क्र.३/२०११/भाषा-२,दि. ०७.०७.२०११.
४) मराठी भाषा विभाग शासन निर्णय क्र.विनिमं-२०१४/१३/प्र.क्र.१८/भाषा-२, दि. २२.०७.२०१४.

**शासन निर्णय -**

मराठी विश्वकोशाच्या संपादन कार्यासंबंधात निरनिराळ्या विद्यापीठात व महाविद्यालयातील जेष्ठ प्राध्यापक, संशोधक, संपादक इत्यादीच्या सेवा अभ्यागत संपादक म्हणून विश्वकोश निर्मिती मंडळ कार्यालय, वाई, जि. सातारा येथे लिखाणासाठी व इतर संपादकीय कामासाठी घेण्याबाबत सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०६.०६.१९६३ व दि.३१.०३.१९६६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान केलेले अधिकार दि.१ एप्रिल, २०१५ ते ३१ मार्च, २०१८ पर्यंत चालू ठेवण्यास खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून शासन मंजुरी देत आहे.

**अट क्र. १ : प्रदान वित्तीय अधिकार बाह्य प्रस्तावावरील खर्चास शासनाची पूर्व संमती घेऊन त्यानंतरच असा खर्च करण्यात यावा.**

**अट क्र. २ : निधी वितरीत करण्याबाबतचे निर्बंध शिथील करणे आवश्यक असल्यास अशा प्रस्तावास शासनाची पूर्व संमती घ्यावी.**

**अट क्र. ३ : खर्च विषयक प्रस्ताव सादर करताना नियमांचा / आदेशाचा आधार व खर्च विषयक सविस्तर तपशिल उपलब्ध करावा.**

**अट क्र. ४ : अन्यत्र काम केल्याने जास्तीचा अतिरिक्त भार पडणार नाही याची दक्षता घ्यावी.**

२. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांनी उपरोक्त अटींचे पालन होईल या दृष्टीने अभ्यागत संपादकांच्या कामाचे नियोजन करावे व त्यासंदर्भात आवश्यक ते निकष निश्चित करावेत.

३. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-०२, प्रधानशीर्ष - २२०५ - कला व संस्कृती, १०२ - कला व संस्कृती प्रचालन, (०१) (०२) - मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, (२२०५ ३१८१) योजनेतर- १६ प्रकाशने तसेच झेडएफ ०२ प्रधानशीर्ष २२०५ कला व संस्कृती १०२ कला व संस्कृती प्रचालन (०२)(०३) मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे विकास कार्यक्रम योजनांतर्गत(२२०५ ३२२३)३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर बाबी) या दोन्ही लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूदीतून मासिक निधीच्या उपलब्धतेनुसार भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौसं-४५८/१५/व्यय-४, दि.१६.६.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१३१५२६५३९१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2015.07.13 15:29:04 +05'30'

**लिना वि.धुरू**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई
२. महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषाधिकारी, सातारा / उप कोषाधिकारी वाई, जि. सातारा.
६. वित्त विभाग (व्यय-४/अर्थ-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.